**शासन निर्णय क्र.माशाह-३११९/प्र.क्र.३५७ /**
**एसएम-१, दि. ६.११.२०१९ रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः माशाह-३११९/प्र.क्र.३५७/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २४ एप्रिल, २०२३

**वाचा** : शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक माशाह २०११/(२१०/११)/माशि-३ दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२

**संदर्भ** : १) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र. माशाह-३११९/प्र.क्र.३५७/एस.एम.१, दि. ०६.११.२०१९
२) सचिव,रामकृष्ण शारदा मिशन यांची दि.०५.०३.२०२१ रोजीची तक्रार
३) रिट याचिका क्रमांक ३४०३/२०२२ मध्ये मा. न्यायालयाने दिलेले दि.०९.०२.२०२३ रोजीचे आदेश
४) मा.मंत्री,शालेय शिक्षण यांचे दि.१८.०४.२०२३ रोजीचे आदेश

**प्रस्तावना :**

उपरोक्त संदर्भ क्रमांक १ अन्वये रामकृष्ण शारदा मिशन, कामठी, जि. नागपूर संचालित शारदा मिशन स्कूल ऑफ होमसायन्स, कामठी जि.नागपूर या शाळेचे बुध्दिष्ठ नामदेवराव खैरे मल्टीपर्पज एज्युकेशन सोसायटी, मु.पो. दहेगांव, ता.राळेगांव, जि.यवतमाळ या संस्थेस व्यवस्थापन हस्तांतर करण्यात आले होते. हस्तांतरातील अटी शर्तींचा नवीन संस्थेव्दारे भंग होत असल्याने रामकृष्ण शारदा मिशनने हस्तांतर रद्द करण्याबाबत संदर्भ २ अन्वये शासनास निवेदन सादर केले होते. तसेच मा.उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपिठात रिट याचिका क्र.३४०३/२०२२ दाखल केली होती. सदर याचिकेत मा. न्यायालयाने संदर्भ क्र ३ अन्वये पारित केलेल्या आदेशानुसार मा.मंत्री,शालेय शिक्षण यांचे कडे दि.६.४.२०२३ रोजी सुनावणी आयोजित करण्यात आली होती व मा.मंत्री, शालेय शिक्षण यांनी दि.१८.४.२०२३ रोजी सुनावणीचे आदेश पारित केले आहेत. सदर आदेशांच्या अनुषंगाने संदर्भ १ येथील शासन निर्णय रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

रामकृष्ण शारदा मिशन, ता. कामठी, जि. नागपूर संचालित शारदा मिशन स्कूल ऑफ होमसायन्स, कामठी जि.नागपूर या शाळेचे बुध्दिष्ठ नामदेवराव खैरे मल्टीपर्पज एज्युकेशन सोसायटी, मु.पो. दहेगांव, ता.राळेगांव, जि.यवतमाळ या संस्थेस शासन निर्णय क्र.माशाह- ३११९/प्र.क्र.३५७/एस.एम.-१ दि.६.११.२०१९ अन्वये करण्यात आलेले व्यवस्थापन हस्तांतर रद्द करण्यात येत आहे.

२. विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर यांनी या शासन निर्णयाच्या अनुषंगाने कार्यवाही १५ दिवसात करावी व त्याबाबत शासनास अवगत करावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२४१६०४११७०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN RAJARAM MUNDHE

Digitally signed by PRAVIN RAJARAM MUNDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DC78036626EC580D66C0AC502D43AF5F670B5BA13F51213AD071ACD53714A284, cn=PRAVIN RAJARAM MUNDHE
Date: 2023.04.25 20:45:43 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) शिक्षण संचालक, (माध्यमिक/उच्च माध्यमिक),शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

२) विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर.

३) शिक्षणाधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर.

४) अध्यक्ष/ सचिव रामकृष्ण शारदा मिशन, कामठी, जि.नागपूर

५) अध्यक्ष/ सचिव, बुध्दिष्ठ नामदेवराव खैरे मल्टीपर्पज एज्युकेशन सोसायटी मु.पो.दहेगांव, ता. राळेगांव जि. यवतमाळ

६) निवडनस्ती (एसएम-१).